सहायक कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या पदावरुन कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या पदावर पदोन्नती व पदस्थापना.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

**शासन आदेश क्रमांकः पीओजी-११२०/प्र.क्र.१३९/सेवा-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ०५ जानेवारी, २०२२

**पहा :** शासन निर्णय,पाटबंधारे आणि वीज विभाग क्र.जीएबी-१०७०-ई (१), दिनांक १९.१२.१९७०

**शासन आदेश :-**

सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत सहायक कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या संवर्गातील श्री. मनोज राजाराम ठाकरे यांना, संदर्भाधीन शासन निर्णयान्वये विहित केलेल्या सेवाप्रवेश नियमानुसार, कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या पदावर (सुधारित वेतन मॅट्रीक्स एस-२३ : रु.६७७००-२०८७०० ) (असुधारित वेतन संरचना पी.बी.-३ वेतन बँड रूपये १५६००-३९१०० ग्रेड वेतन ६६००/- या वेतनसंरचनेत) सन २०२०-२१ च्या निवडसूचीमध्ये ज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात खुल्या प्रवर्गातील रिक्त पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात येत असून पदोन्नतीउपरांत कार्यकारी अभियंता (स्थापत्य) म्हणून त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ. क्र. | ज्येष्ठता क्रमांक व दिनांक | अधिकाऱ्याचे नाव | वाटप झालेला विभाग | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| १ | १२ २१.७.२०२० | श्री. मनोज राजाराम ठाकरे (अ.ज.) सार्वजनिक बांधकाम (इमारती) विभाग, पुणे | पुणे | कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. १, सोलापूर |

२. श्री. ठाकरे, सहायक कार्यकारी अभियंता यांची सदर पदोन्नती व पदस्थापना पुढे नमूद केलेल्या बाबींच्या अधीन राहून तात्पुरत्या स्वरुपात करण्यात येत आहे :

i. वरील पदोन्नती ही मा. सर्वोच्च न्यायालयातील विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ मधील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.
ii. सदर पदोन्नती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने सदर पदोन्नतीच्या परिणामी त्यांना नियमितपणाचा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क राहणार नाही.

३. श्री. ठाकरे यांना देण्यात आलेली सदर पदोन्नती ही कोणतीही पूर्वसूचना किंवा नोटीस न देता रद्द करण्याचा अधिकार शासन राखून ठेवत आहे.

४. संबधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी श्री. ठाकरे यांना त्यांच्या नवीन नियुक्तीच्या जागी रुजू होता यावे म्हणून आवश्यक ती स्थानिक पर्यायी व्यवस्था करून पदमुक्त करावे व नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर होण्यास सांगावे. तसेच, श्री. ठाकरे यांना पदोन्नतीने पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते पदस्थापनेच्या ठिकाणी कोणत्या

दिनांकास हजर झाले याबाबत शासनास doser1.pwd@maharashtra.gov.in या ई-मेल आयडीवर त्वरित अवगत करावे.

५. श्री. ठाकरे यांनी कमीत कमी पदग्रहण अवधी घेऊन नव्या पदाचा पदभार स्वीकारावा व आपला पदग्रहण अहवाल शासनास विनाविलंब सादर करावा. श्री. ठाकरे हे पदोन्नतीने पदस्थापनेच्या पदावर या आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या विहीत मुदतीत रुजू न झाल्यास त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन (dies non) म्हणून गणला जाईल. तसेच, श्री. ठाकरे यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम-२३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

६. संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, श्री. ठाकरे यांनी पदभार स्वीकारल्याचा दिनांक त्वरित शासनास doser1.pwd@maharashtra.gov.in या ई-मेल पत्त्यावर कळवावा. विहीत कालावधीत ते रुजू न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरित अवगत करण्यात यावे, जेणेकरुन संबंधितांविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई त्वरित करणे शक्य होईल. म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार त्यांचा रजा अर्ज स्वीकारु नये / मंजूर करु नये.

७. श्री. ठाकरे यांनी पदोन्नतीच्या पदावर पदग्रहण केल्यापासून एक महिन्याच्या आत वेतननिश्चितीचा विकल्प द्यावा. असा विकल्प विहित मुदतीत न दिल्यास त्यांची वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम क्र. ११ (१) (ए) अनुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेवून करण्यात यावी.

८. श्री. ठाकरे यांनी नवीन नियुक्तीच्या पदाचा पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास तसेच संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप, पुणे यांना कळवावा.

९. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१०५११४२४३९६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gangadhar
Mahajan Gaikwad

Digitally signed by Gangadhar Mahajan Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0d38ef6405f5cae15731340f134ce56f50e939ba034b962c317c33ce102270d0, serialNumber=5eeead19a0ef3d2434afccb36079e80e7ede5a45017ec3297470e90ae602404b, cn=Gangadhar Mahajan Gaikwad
Date: 2022.01.05 11:43:54 +05'30'

**( गं. म. गायकवाड )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई / कोकण/ पुणे / नाशिक / औरंगाबाद / नांदेड/ अमरावती/ नागपूर / राष्ट्रीय महामार्ग विभाग, नवी मुंबई,
३. मुख्य अभियंता (विद्युत), मुंबई,
४. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
५. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप पुणे,
६. सार्वजनिक बांधकाम विभागातील सर्व अधीक्षक अभियंते,
७. संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
८. श्री. मनोज राजाराम ठाकरे, सहायक कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (इमारती) विभाग, पुणे,

९. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे / सोलापूर,
११. सामान्य प्रशासन विभाग, का.-१२/१६-ब, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. मा. मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१३. मा. मंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१४. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१५. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१६. अपर मुख्य सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
१७. सचिव ( रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
१८. सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१९. कार्यासन आस्था-१, आस्था-३, सेवा-२, सेवा-६, संगणक कक्ष, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२०. निवडनस्ती.